**मंत्रालयाव्यतिरिक्त इतर शासकीय कार्यालयांनी /प्राधिकरणांनी लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई यांचेकडून ई- मेलद्वारे केल्या जाणाऱ्या पत्रव्यवहारांवर कार्यवाही करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.:- एलपीएल १०१६/अनौ.सं. क्र. १२/पंधरा**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०७ डिसेंबर, २०१६.

**शासन परिपत्रक**

मंत्रालयीन विभागाव्यतिरिक्त शासनाची विविध प्राधिकरणे, शासकीय कार्यालयांना / यंत्रणांना महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई यांच्या कडून ई - मेलद्वारे केल्या जाणाऱ्या पत्रव्यवहारांची दखल घेऊन त्यावर विहित मुदतीत कार्यवाही करण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालयाकडून तक्रारींच्या अनुषंगाने यापुढे केला जाणारा जास्तीत जास्त पत्रव्यवहार (गोपनीय पत्रव्यवहार वगळून) स्कॅन करुन ई- मेलद्वारे केला जाणार असून पोष्टामार्फत कोणतीही हार्डकॉपी मागाहून पाठविली जाणार नाही. सदर पत्रव्यवहारासाठी वापरले जाणारे ई - मेल पत्ते पुढीलप्रमाणे -

**लोक आयुक्त शाखा -**

ar2.lokayukta@maharashtra.gov.in
ar3.lokayukta@maharashtra.gov.in
lokayukta@maharashtra.gov.in
(दूरध्वनी क्र. २२०२४५४० /२२०२३८२२/ २२८३५६००)

**उप लोक आयुक्त शाखा-**

ar1.lokayukta@maharashtra.gov.in
ar4.lokayukta@maharashtra.gov.in
upalokayukta@maharashtra.gov.in
(दूरध्वनी क्र. २२०२४५४० /२२०२४५०३/ २२८२४३५८)

२. लोक आयुक्त कार्यालयाकडून केल्या जाणाऱ्या पत्रव्यवहाराला प्रतिसाद देण्यासाठी कालमर्यादा प्रत्येक पत्रात विहित केलेली असते. त्यामुळे लोक आयक्त कार्यालयाकडून येणारी सर्व ई - मेल व त्यासोबतची अटॅचमेंटस् रोजच्या रोज नियमितपणे तपासून ती संबंधित अधिकाऱ्यांकडे तात्काळ सुपूर्द केली जातील याची दक्षता घेण्यात यावी. तसेच ई- मेलद्वारे प्राप्त झालेल्या संदर्भाला विहित कालमर्यादेत प्रतिसाद दिला जाईल याची दक्षता संबंधतांनी घ्यावी.

३. लोक आयुक्त कार्यालयाला सादर करण्यात येणारे अहवाल (गोपनीय अहवाल वगळून) ई - मेलद्वारे वर नमूद केलेल्या पत्त्यांवर पाठविण्यात यावेत. संबंधित अधिकाऱ्यांची स्वाक्षरी असलेले अहवाल स्कॅन करुन पाठवावेत. जेणेकरुन अहवाल पाठविणाऱ्या अधिकाऱ्याची ओळख स्वाक्षरीमुळे सुनिश्चित होऊ शकेल.

४. लोक आयुक्त कार्यालयाचे कामकाज अर्धन्यायिक स्वरुपाचे असल्याने अहवाल पाठवितांना वस्तुस्थितीजन्य अहवाल पाठविले जातील याची दक्षता घ्यावी.
५. ई - मेलद्वारे पत्र पाठविताना कोणतीही अडचण आल्यास त्यासंदर्भात लोक आयुक्त कार्यालयाकडे दूरध्वनीवरुन संपर्क साधावा.
६. लोक आयुक्त कार्यालयामार्फत ई - मेलद्वारे केल्या जाणाऱ्या पत्रव्यवहाराची तात्काळ दखल घेण्यात यावी व ई - मेल मध्ये नमूद केलेली कार्यवाही त्वरित करून विहित मुदतीत लोक आयुक्त कार्यालयाकडे अहवाल सादर करण्यात यावेत.
७. लोक आयुक्त कार्यालयाकडे पत्रव्यवहार करताना संबंधित कार्यालयांनी त्यांच्या कार्यालयाचे दूरध्वनी क्रमांक, फॅक्स क्रमांक व ई - मेल आयडी इत्यादी नमूद करावेत.
८. त्याचप्रमाणे लोक आयुक्त कार्यालयाकडून ई - मेलद्वारे पत्र प्राप्त झाल्याची पोहोच त्याचदिवशी ई - मेलद्वारे लोक आयुक्त कार्यालयास देण्यात यावी.

मंत्रालयीन विभागाव्यतिरिक्त इतर सर्व शासकीय कार्यालयांनी व यंत्रणांनी लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालयाकडून ई-मेल द्वारे प्राप्त होणाऱ्या पत्रांवर उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०७१५५८३००४०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Khalid B Arab

Digitally signed by Khalid B Arab
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=17b1bdae334a3efab8ffa330885658eb14b09969ecbab94b7f20dfd8f09f568b, cn=Khalid B Arab
Date: 2016.12.07 16:00:41 +05'30'

**( खालिद बी. अरब )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई,
३. शासनाचे मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव,
५. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,(पत्राने)
६. सर्व मंत्रालयीन विभाग,
७. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख/प्राधिकरणे (मंत्रालयीन विभागामार्फत)
८. निवड नस्ती.